**महाराष्ट्र शासन**

क्र.कृषिआ-२८२१/प्र.क्र.३१८/१६-अे
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास
व मस्त्यव्यवसाय विभाग, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई -३२
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०२१.

**विषय:- नाशिक येथे कृषी भवन इमारत बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**संदर्भ :-** आयुक्त (कृषि) यांचे पत्र क्र. मृदसं/मृद-७/कृ.भ.इ.बां./३७२६४/२०२१, दि.१२.११.२०२१.

**ज्ञापन :-**

उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये नाशिक येथे कृषी भवन इमारत बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत प्रस्ताव प्रस्ताव प्राप्त झालेला आहे.

२. नाशिक मुख्यालयी कृषि विभागाची विविध कार्यालये वेगवेगळ्या ठिकाणी विखुरलेली आहेत. सदरची सर्व कार्यालये एकाच ठिकाणी सुसज्ज इमारतीमध्ये असणे कामकाजाच्या दृष्टीने आवश्यक आहे. कृषि विभागाचा लोकसंपर्क लक्षात घेता तसेच विविध कार्यालये विखुरले गेल्याने प्रशासकीयदृष्टया व शेतकऱ्यांच्या दृष्टीने सोयीचे नाही. शिवाय भाड्याच्या जागेत कार्यरत कार्यालयांसाठी मोठ्या प्रमाणावर भाडे अदा करावे लागते. कृषि विभागामार्फत शेतकऱ्यांसाठी वेगवेगळे उपक्रम राबविण्यात येत असल्याने एकाच छताखालील अद्ययावत कृषि संकुल बांधणे आवश्यक आहे. कृषि विभागाच्या वहिवाटीतील शिंगाडा तलाव, गडकरी चौक, नाशिक येथे जागा उपलब्ध आहे.

३. शिंगाडा तलाव, गडकरी चौक, नाशिक येथे नगर भूमापन क्र.२१० मध्ये कृषि विभागाचे ७२०३.९० चौ.मी. क्षेत्र असून सदर जागेवर शेतकऱ्यांच्या सुविधेकरीता तसेच कृषि विभागाची विविध कार्यालये आणि प्रयोगशाळा या करीता नव्याने इमारत बांधकाम करण्याचे प्रस्तावित आहे.

४. प्रस्तावित इमारतीत विभागीय कृषि सहसंचालक, नाशिक विभाग, नाशिक, तालुका कृषि अधिकारी, नाशिक, अन्नप्रक्रीया संचालनालय यांचे कार्यालय, मृदचाचणी प्रयोगशाळा, खतनियंत्रण प्रयोगशाळा, बैठक सभागृह, संगणक कक्ष व सुरक्षारक्षक कॅबिन इत्यादी कार्यालये समाविष्ट आहेत.

५. प्रस्तावित इमारतीसाठी आवश्यक त्या सोयीसुविधांसह नियोजित कृषि भवन, नाशिक येथील बांधकामाचा आराखडा व सन २०२१-२२ मधील दरसूचीवर आधारित अंदाजपत्रक **(प्रपत्र-अ)** कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक यांनी तयार केले आहे.

६. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रसिध्द केलेले वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग- पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखाली प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारानुसार शासकीय नागरी बांधकामांना

(निवासोपयोगी इमारती आणि शासकीय गृहे या व्यतिरिक्त इतर बांधकामे) रु.४ लक्ष पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्यास विभाग प्रमुख म्हणून आयुक्त (कृषि) सक्षम प्राधिकारी आहेत. रु.४ लक्ष पेक्षा जास्त रकमेच्या बांधकामांना मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची मान्यता असणे आवश्यक आहे.

७. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.५ जानेवारी, २०१५ नुसार प्रशासकीय मान्यता देताना घ्यावयाची दक्षता याबाबत आदेशाचा नमुना व मार्गदर्शक सूचना नमूद केलेल्या आहेत. नियोजन विभागाच्या दि.११ जून, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१५ कोटीपर्यंतच्या इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यास प्रशासकीय विभाग सक्षम आहे. तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२५.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१५ कोटी पेक्षा कमी किंमतीच्या इमारतींच्या कामांना उपभोक्ता विभागामार्फत प्रशासकीय मान्यता देण्यासाठी क्षेत्रीय मुख्य अभियंता यांना अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी रु.१४९९.७० लक्ष एवढ्या किमतीच्या ढोबळ अंदाजपत्रकास तांत्रिक मंजुरी प्रदान केली आहे.

८. प्रस्तावित कामाचे वर्षनिहाय खर्चाचे अंदाजित नियोजन पुढीलप्रमाणे राहील.

**कृषि भवन, नाशिक**

| आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च (रु.लक्ष) |
|---|---|
| २०२१-२२ | ३०० लक्ष |
| २०२२-२३ | ३०० लक्ष |
| २०२३-२४ | ३०० लक्ष |
| २०२४-२५ | ३०० लक्ष |
| २०२५-२६ | २९९.७० लक्ष |
| एकूण | १४९९.७० लक्ष |

९. **ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या राहून देण्यात येत आहे.**

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजुरी घेऊनच करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७ /तां.क.१, दि.१०/०१/२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरु करण्यापूर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय .बीडीजी२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२ दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

**१०.** सदर कामाची सुरुवात सन २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून सुरु होत आहे.

**११.** सदर कामासाठी येणारा खर्च मागणी क्र.एच-०८, ४०५९ ३०९२ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर नियतव्ययातून अर्थसंकल्पित करुन भागविण्यात येईल.

**१२.** प्रस्तुत मान्यता वित्त विभाग, शासन निर्णय दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रसिध्द केलेल्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ अंतर्गत तसेच नियोजन विभाग, शासन निर्णय दि.११ जून, २०१८ तसेच तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय दि.२५.०९.२०१९ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार देण्यात येत आहे.

**१३.** प्रस्तुत ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२१११५१५०५५२९४०१ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2021.11.15 15:10:06 +05'30'

**(सरिता बांदेकर-देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. सचिव (कृषि), कृषि व पदुम,विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. उप सचिव (अर्थसंकल्प), कृषि पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक (मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, पुणे
८. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक
१०.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक
११.कोषागार अधिकारी, नाशिक
१२.निवड नस्ती/१६अे